**सहकारी साखर कारखाने यांच्या कामाचे मुल्यमापन करणे, गुणात्मक सुधारणा करणे, सखोल अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-ससाका २०१८/प्र.क्र. १५२/३-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख : ३० जून, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यात सुमारे २ लाख सहकारी संस्था कार्यरत असून या संस्थांची सभासद संख्या सुमारे ५.५ कोटी आहे. राज्यातील सहकारी क्षेत्राचे खेळते भांडवल सुमारे रु.६ लाख कोटी आहे. सहकार क्षेत्रातील प्रामुख्याने विविध कार्यकारी सहकारी संस्था, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, सहकारी साखर कारखाने, सहकारी सूत गिरण्यां, यंत्रमाग सहकारी संस्था, सहकारी कृषि पणन व प्रक्रीया संस्था, मध्यवर्ती सहकारी ग्राहक संस्था, नागरी / ग्रामीण बिगर शेती सहकारी पत संस्था, सहकारी दुध उत्पादक संघ, औद्योगिक सहकारी संस्था इत्यादी संस्थाचे राज्याच्या ग्रामीण अर्थव्यवस्थेत अत्यंत महत्वाचे योगदान आहे.

राज्यातील सर्व सहकारी संस्थांचे कामकाज सहकार कायदा, नियम, संस्थेचे उपविधी, नाबार्डच्या मार्गदर्शक सुचना व शासनाच्या धोरणात्मक निर्णयास अधीन राहून करणे अपेक्षित आहे. तथापि काही संस्थांनी कायदा, नियम, उपविधीतील तरतुदी व शासनाच्या धोरणात्मक निर्णयांचे उल्लंघन करुन निर्णय घेतल्यामुळे अशा संस्था आर्थिक अडचणीत आल्याचे निदर्शनास आले आहे. याबाबत काही प्रमुख सहकारी संस्थांच्या वर्गाचा सखोल अभ्यास करुन या संस्थांच्या कामकाजाचे योग्य मुल्यमापन करणे व त्यामध्ये गुणात्मक सुधारणा करण्यासाठी उपाययोजना करणे आवश्यक आहे. त्यानुसार राज्यातील सहकारी साखर कारखाने यांच्या कामकाजाचे मुल्यमापन करणे, गुणात्मक सुधारणा करणे याबाबत सखोल अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सहकारी साखर कारखाने यांच्या कामकाजाचे मुल्यमापन करणे व त्यामध्ये गुणात्मक सुधारणा करणे याबाबत सखोल अभ्यास करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव व पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. ज्ञानदेव मुकणे, साखर संचालक (अर्थ), साखर आयुक्त कार्यालय, पुणे. | अध्यक्ष |
| २ | श्री. शैलेश कोतमीरे, साखर संचालक (प्रशासन), साखर आयुक्त कार्यालय, पुणे. | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३ | श्री. सचिन रावळ, प्रादेशिक सहसंचालक, कोल्हापूर. | सदस्य |
| ४ | श्री. राजेश सुरवसे, सहसंचालक साखर (प्रशासन), महाराष्ट्र राज्य पुणे. | सदस्य |
| ५ | श्री. मंगेश तिटकारे, सहसंचालक साखर (अर्थ), महाराष्ट्र राज्य पुणे. | सदस्य सचिव |

२. उपरोक्त समितीने सहकारी साखर कारखान्याच्या कामकाजाचे मुल्यमापन करताना खालील मुद्दे विचारात घ्यावेत.

१) संस्था स्थापन करण्याचा उद्देश, उद्देशाची पुर्तता कितपत झाली आहे?

२) संस्थांचे उद्देश साध्य करण्यात आलेल्या अडी-अडचणी व त्या सोडविण्यासाठी करावयाची उपाययोजना.

३) संस्थांना दिलेले शासकीय अर्थसहाय्य, त्याचा विनियोग व आतापर्यंत झालेली वसुली.

४) संस्थांनी केलेले उल्लेखनीय कामकाज.

५) सभासदांच्या आर्थिक उन्नतीत संस्थेचे योगदान.

६) संस्थामुळे झालेली रोजगार निर्मिती.

७) संस्थांच्या कामकाजात आढळून आलेल्या त्रुटी, अनियमितता व गैरव्यवहार

८) अनियमितता व गैरव्यवहार प्रकरणी विभागाने केलेली कारवाई

९) अवसायनात गेलेल्या संस्थांचे पुनर्जिवन करण्यासाठी उपाययोजना

१०) संस्थांच्या कामकाजात गुणात्मक वाढ होण्यासाठी करावयाच्या उपाययोजना.

११) सहकार चळवळीच्या व्यापक हिताच्या दृष्टीने शासन स्तरावर करावयाचे धोरणात्मक निर्णय.

३. सदर समितीने आपला अहवाल दोन महिन्यामध्ये शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१२१५११४९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Balasaheb Ishwar

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87ffeb64d4c23006f1b500524bc33913d327661599daf810e620a1eb045fa45f, serialNumber=327fe83917b9691d96f2c6aeb03b51a86a595ccac9264923ea4cd090ffd03e83, cn=Sawant Balasaheb Ishwar
Date: 2018.07.02 12:18:15 +05'30'

**( बाळासाहेब सावंत )**

कक्ष अधिकारी महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. अपर मुख्य सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. साखर आयुक्त, महाराष्ट राज्य पुणे.
६. सर्व प्रादेशिक सहसंचालक.
७. सर्व प्रादेशिक उपसंचालक.
८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
९. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१०. श्री. ज्ञानदेव मुकणे, साखर संचालक (अर्थ), साखर आयुक्त कार्यालय, पुणे.
११. श्री. शैलेश कोतमीरे, साखर संचालक (प्रशासन), साखर आयुक्त कार्यालय, पुणे.
१२. श्री. सचिन रावळ, प्रादेशिक सहसंचालक, कोल्हापूर.
१३. श्री. राजेश सुरवसे, सहसंचालक साखर (प्रशासन), महाराष्ट्र राज्य पुणे.
१४. श्री. मंगेश तिटकारे, सहसंचालक साखर (अर्थ), महाराष्ट्र राज्य पुणे.
१५. निवडनस्ती (३-स)